**महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या कार्यालयातील अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन

### मराठी भाषा विभाग

**शासन निर्णय क्रमांक : साअस्था-२०२०/प्र.क्र.३५/आस्था-२**

नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०४ मार्च, २०२०

वाचा

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१, दि.११.०२.२०१६.
२) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्रमांक : आढावा २०१६/प्र.क्र.२३८/आस्था-१, दि.१४.११.२०१९.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. १२.०२.२०२०.
४) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्रमांक : आस्थाप-२०१९/प्र.क्र.१३१/आस्था-२, दि.२३.०९.२०१९.
५) सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ यांचे पत्र क्र. सासंमं २०२०/ आस्था/म.भा.वि./न.क्र.१७९/३६४, दि.११.०२.२०२०.

## शासन निर्णय -

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या कार्यालयातील एकूण ०४ अस्थायी पदांना संदर्भ ४ येथील दि. २३.०९.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.१०.२०१९ ते दिनांक २९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे.

२. संदर्भ ३ येथील दि.१२.०२.२०२० च्या शासन निर्णयानुसार अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यासाठी प्रशासकीय विभागांना प्राधिकार देण्यात आले आहेत. या विभागाचा आकृतीबंध संदर्भ २ अन्वये निर्गमित करण्यात आला आहे. ही वस्तुस्थिती विचारात घेऊन महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या वरील संदर्भ क्र.५ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे एकूण ०४ अस्थायी पदांना **दिनांक ०१.०३.२०२० ते दिनांक ३१.०८.२०२०** पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनसंरचना | सुधारित आकृतीबंधानुसार मंजूर अस्थायी पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | सहायक लेखाधिकारी | एस-१५ : ४१८००-१३२३०० | १ |
| २ | निम्नश्रेणी लघुलेखक | एस-१४ : ३८६००-१२२८०० | १ |
| ३ | लिपिक-टंकलेखक | एस-६ : १९९००-६३२०० | १ |
| ४ | वाहनचालक | एस-६ : १९९००-६३२०० | १ |
| **एकूण** | | | **४** |

३. सदर बाबीवर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडएफ-०२, लेखाशीर्ष २२०५ कला व संस्कृती, (००) १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०१) अनिवार्य (०१) (०१) राज्य साहित्य व संस्कृती मंडळ (२२०५ ३१७२) - ०१ वेतन" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३०४१४५२२८०५३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANGESH PARSHURAM KUDTARKAR

Digitally signed by MANGESH PARSHURAM KUDTARKAR
DN: CN = MANGESH PARSHURAM KUDTARKAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = MARATHI LANGUAGE
Date: 2020.03.04 15:41:56 +05'30'

**(मं.प.कुडतरकर)**
**कार्यासन अधिकारी**

प्रति,

१. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
५. वित्त विभाग (व्यय-४) व आकृतीबंध पुनर्रचना कक्ष, मंत्रालय, मुंबई.
६. मराठी भाषा विभागाची सर्व कार्यासने.
७. निवडनस्ती.